अकोले पंचायत समिती (जि. अहमदगनर )
प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास प्रशासकीय
मान्यता देणेबाबत...

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २०१०/प्र.क्र.१६/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- १५ फेब्रुवारी, २०१०

संदर्भ :- अति.मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.,अहमदनगर यांचे पत्र क्र.बांध/का.४/प्रशा-१/४१/१०,दि. १४.१.२०१०

प्रस्तावना :-

अति.मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.,अहमदनगर यांनी संदर्भीय दिनांक १४.१.२०१० च्या पत्रान्वये अकोले पंचायत समितीकरीता नविन प्रशासकीय इमारत बांधण्यास प्रशासकीय मान्यता मिळण्याची विनंती केली आहे.

२. अकोले पंचायत समितीची प्रशासकीय इमारत ४० वर्षापूर्वीची असुन, अतिशय जीर्ण झालेली आहे. तसेच अकोले तालुका आदिवासी असून, भौगोलिक दृष्ट्या मोठा असल्याने व पंचायत समितीच्या कामकाजात मोठ्या प्रमाणात वाढी झालेली असल्याने सद्य:ची कार्यालयीन इमारत अपुरी पडत आहे. त्याचबरोबर अधिनस्थ अन्य कार्यालये विखुरलेली असून, ती एकाच प्रशासकीय इमारतीत आणण्याच्या व जनतेच्या सोयीच्या दृष्टीने नविन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम प्रस्तावित करण्यात आले आहे. या करीता अस्तित्वातील इमारत पाडून त्या ठिकाणी नवीन इमारत बांधण्याच्या दृष्टीने अकोले पंचायत समितीच्या सर्वसाधारण सभेने दिनांक २०.११.२००९ रोजी ठराव मंजूर केला आहे. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. अहमदनगर यांनी नविन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाकरीता मुख्य वास्तुशास्त्रज्ञ सा.बां.विभाग, मुंबई यांच्याकडील टी/एडीएम/५५११ हा नमुना नकाशाप्रमाणे १०२६.०० चौ.मी. जोता क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित केले आहे. सदर आराखड्यानुसार रु.१,६४,६७,०९३/- इतक्या किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर करण्यात आले आहे. सदरील अंदाजपत्रक सन २००९-१० च्या दरसुचीवर आधारीत असून, ते उप अभियंता जि.प.(बांध.), उप विभाग अकोले व कार्यकारी अभियंता (बांध.) उत्तर विभाग, जि.प.,अहमदनगर यांनी सांक्षाकित केले आहे. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., अहमदनगर यांनी प्रस्तावासोबत नमुना नकाशाची प्रत, साईट प्लॅन, सविस्तर अंदाजपत्रक, जागेचा सात-बारा उतारा, अस्तित्वातील इमारत जीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र व फोटो, ठरावाची प्रत इ. कागदपत्रे सादर केलेली आहेत.

अति.मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.,अहमदनगर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची, मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांनी केलेल्या तांत्रिक छाननी अंती, अकोले पंचायत समितीच्या रु.१,५९,९१,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या इमारतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

-: शासन निर्णय :-

अकोले (जिल्हा-अहमदनगर ) पंचायत समिती करीता, अस्तित्वातील मोडकळीस आलेले इमारत बांधकाम पाडून त्या ठिकाणी नविन प्रशासकीय इमारतीच्या एकूण रक्कम रुपये-१,५९,९१,०००/- (रुपये एक कोटी एकोणसाठ लक्ष एक्यानव हजार फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

(१) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता, जि.प.,सा.बां. उत्तर विभाग, अहमदनगर यांनी नियोजन करावे.

(२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रमा किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

(३) या कामी मंजूर प्रमा किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

(४) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

(५) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

२.	अकोले पंचायत समितीच्या नविन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे :-

| GENERAL ABSTRACT | | |
|---|---|---|
| **Sr.** | **Work Details** | **Amount (in Rupees)** |
| 1 | Cost Of Work Building | 11911098.00 |
| 2 | Add 11% for Electrification charges | 1310220.78 |
| 3 | Add 6% for Water supply & Sanitation | 714665,88 |
| 4 | Add 4% for Contingencies | 476443.92 |
| 5 | Add 2% for Computerisation Sta. | 238221.96 |
| 6 | Add for Rain Water Harvesting | 29777.75 |
| 7 | Add for Fire Fighting | 714665.88 |
| 8 | Add for Compound Wall | 595554.90 |
| | Total Rs. | 15990736.19 |
| | Say | Rs.1,59,91,000/- |

३.	उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. या कामावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४.	या कामी मुख्य अभियंता, सा.बां.वि. किंवा मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस, पुणे यांच्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेवून, त्याची प्रत शासनास सादर करावी.

५.	प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, २९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ. क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

६.	प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००२२१५१६५७४८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
१) विभागीय आयुक्त नाशिक विभाग, नाशिक
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस, पुणे
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अहमदनगर
५) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद अहमदनगर
६) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद अहमदनगर
७) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा अहमदनगर
८) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
९) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा नाशिक विभाग, नाशिक
१०) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, अहमदनगर
११) सभापती, पंचायत समिती, अकोले, जिल्हा अहमदनगर
१२) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, अकोले, जिल्हा अहमदनगर
१३) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५) सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१६) का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई